**प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या समरुप राज्य हिश्श्याचा निधी (SC/ST Component) वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०२२/प्र.क्र.३६/गृनिधो-२(शिकाना)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२३

**वाचा : गृहनिर्माण व शहरी व्यवहार मंत्रालय, केंद्र शासन यांचे मंजूरी आदेश क्रमांक :**

1. N-11012/30/2022-HFA-IV-UD (EFS-9126555), Dt. 23th December, 2022.
2. N-11012/60/2022-HFA-IV-UD (EFS-9142243) , Dt. 23th December, 2022.
3. I-14011/31/2016-HFA-IV(C.No.9038315) , Dt. 29th December, 2022.
4. GoI, Ministry of Finance, Department of Expenditure Letter No.: F. No. 1(46)/PFMS/2022, Dt. 29th November, 2022.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या वाचा येथील आदेशान्वये वित्तीय वर्ष सन २०२२-२३ मध्ये एकूण रूपये ४१.३४६ कोटी इतका SC/ST Component चा केंद्र हिश्श्याचा निधी प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) साठी विविध घटकांतर्गत मंजूर करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या वाचा येथील क्रमांक ४ च्या पत्रान्वये राज्य हिश्श्याचा निधी राज्याच्या अर्थसंकल्पीय निधीतून वितरित करण्याबाबत कळविले असल्यामुळे केंद्र हिश्श्याच्या समरुप राज्य हिश्श्याचा निधी अर्थसंकल्पीय तरतुदीतून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत केंद्र शासनाच्या वाचा येथील अ.क्र. १ ते ३ येथील आदेशान्वये मंजूर केलेल्या रूपये ४१.३४६ कोटी इतक्या निधीच्या समरुप राज्य हिश्श्याचा रुपये २७.५६४ कोटी (अक्षरी रूपये सत्तावीस कोटी छप्पन लक्ष चाळीस हजार फक्त) इतका निधी वाचा येथील अ.क्र. १ ते ३ आदेशात नमुद केलेल्या अंमलबजावणी यंत्रणांना वितरित करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास (म्हाडास) वितरीत करण्यास यान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधी मागणी क्र.क्यू-३, मुख्य लेखाशीर्ष २२१६, गृहनिर्माण, ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (०८) (०२) सर्वांसाठी गृहनिर्माण- अंमलबजावणी यंत्रणांना अनुदाने (प्र.म.आ.यो.) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्ष २२१६३००७ अंतर्गत वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी, वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ८८/२०२३/व्यय-३, दिनांक २८.२.२०२३ नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३०३१८५४५४१५०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA NARAYAN KHETLE

Digitally signed by RAVINDRA NARAYAN KHETLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=188518615e71d343f645c4620bd62f620f5f5af35f72932959997b73ec7e7c41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69DCF3660DD70A5F443CD1B17131804310A79BF3FE40409DFDA1FAD5E072E484, cn=RAVINDRA NARAYAN KHETLE
Date: 2023.03.03 19:01:53 +05'30'

**(रविंद्र खेतले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. आयुक्त आणि संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, सी.बी.डी. बेलापूर , नवी मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
६. सर्व आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका.
७. सर्व कोषागार अधिकारी.
८. उपसचिव (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. सह संचालक, लेखा व कोषागारे कॉम्पुटर सेल, नवीन प्रसासन भवन, ५वा मजला, मंत्रालय, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी, अर्थ व लेखा, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवडनस्ती /गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.